**केंद्र शासनाच्या नैसर्गिक आपत्ती (SDRF/ NDRF) निकषाच्या धर्तीवर नैसर्गिक आपत्तीमुळे बाधित होणाऱ्या आपदग्रस्त व्यक्तींना सन २०२२-२३ ते सन २०२५-२६ या कालावधीमध्ये द्यावयाच्या मदतीचे दर व निकष**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सीएलएस-२०२२/प्र.क्र.३४९/म-३,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २७ मार्च, २०२३.

**वाचा:**

(१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.सीएलएस-५९८३/२४८३६१/प्र.क्र.८२०/म-३, दि. ३१.०५.१९८३

(२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.सीएलएस-०६०४/प्र.क्र.१६८/म-३, दि. १९.०८.२००४

(३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. सीएलएस-२०१०/प्र.क्र.७१/म-३, दि. २६.०३.२०१०

(४) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. सीएलएस-२०१२/प्र.क्र. १५७/म- ३, दि. ३०.१.२०१४

(५) महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्र. सीएलएस-२०१२/प्र.क्र. १५७/म-३, दि.५.८.२०१४

(६) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. सीएलएस-२००५/प्र.क्र. ४०/म-३, दि.१३.०५.२०१५

(७) केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाचे पत्र ३३-०३/२०२०- एनडीएम- १(Vol-II), दि.१०.१०.२०२२.

(८) मा. मंत्रिमंडळाच्या दि.२६.०२.२०२३ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णय.

**प्रस्तावना:-**

राज्यात उद्भवणाऱ्या विविध नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित होणाऱ्या नागरिकांना मदत देण्यासाठी आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ मधील कलम ४८(२) अन्वये राज्य आपत्ती प्रतिसाद निधी (SDRF) ची स्थापना करण्यात आली आहे. या निधीमध्ये केंद्र शासनाकडून ७५ टक्के व राज्य शासनाकडून २५ टक्के या प्रमाणे अंशदान दिले जाते. आर्थिक वर्ष २०२२-२३ करिता रू. ३६०८.८० कोटी इतका राज्य आपत्ती प्रतिसाद निधी मान्य झालेला आहे.यामध्ये रू.१८०४.४० कोटी इतका निधी प्रतिसाद व मदत याकरिता राखीव आहे. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून केवळ चक्रीवादळ, दुष्काळ, भूकंप, आग, पूर, त्सुनामी, गारपीट, दरड कोसळणे, बर्फखंड कोसळणे (हिमवर्षाव), ढगफुटी टोळधाड, थंडीची लाट व कडाक्याची थंडी या १२ नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित होणाऱ्या नागरिकांना मदत अनुज्ञेय आहे.

२. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून मदतीचे वाटप करण्यासाठी मदतीच्या विविध बाबी व मदतीचे दर, अटी व शर्ती केंद्र शासनाने निश्चित केल्या आहेत. विहित दरानुसार व विहित बाबीसाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून मदत अनुज्ञेय आहे. आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ मधील कलम २० अन्वये मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली राज्य कार्यकारी समिती गठीत करण्यात आली आहे. राज्य आपत्ती प्रतिसाद निधी (SDRF) हा मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील राज्य कार्यकारी समितीच्या अधिनस्त ठेवण्यात आलेला आहे. त्यामुळे राज्य कार्यकारी समितीच्या मान्यतेने वर नमूद केलेल्या १२ नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित होणाऱ्या नागरिकांना मदतीचे वाटप करण्यासाठी निधी मंजूर केला जातो.

३. केंद्र शासनाने विहित केलेल्या १२ नैसर्गिक आपत्ती व्यतिरिक्त राज्य शासनाने शासन निर्णय, महसूल व वन विभाग, दिनांक ३०.१.२०१४ अन्वये अवेळी पाऊस, अतिवृष्टी, वीज कोसळणे, समुद्राचे उधाण व आकस्मिक आग या स्थानिक आपत्तीमध्ये बाधित होणाऱ्या नागरिकांना देखील राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या दरानुसार मदत देण्याचे धोरण निश्चित केले आहे. या नैसर्गिक आपत्तींना देखील राज्य प्रतिसाद निधीमधून १०% मर्यादेत मदत अनुज्ञेय करण्यात आली आहे.

४. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, दि.१३.५.२०१५ अन्वये, विविध नैसर्गिक आपत्तीच्या अनुषंगाने राज्य आपत्ती प्रतिसाद निधीतून मदत देण्याकरिता केंद्र शासनाने २०१५ ते २०२० या कालावधीकरिता निश्चित केलेले दर प्रसारीत करण्यात आले आहेत. केंद्र शासनाने त्यांचे पत्र क्र.F.No.३३-०३/२०२०-NDM-I (Vol-II), दि.१०.१०.२०२२ अन्वये राज्य आपत्ती प्रतिसाद निधीसाठी विहित केलेल्या निकष व दर यामध्ये वर्ष २०२२-२३ ते २०२५-२६ या कालावधीकरिता सुधारणा केली आहे. केंद्र शासनाने हे सुधारित निकष व दर आर्थिक वर्ष २०२२-२३ पासून लागू केले आहेत. केंद्र शासनाने सुधारीत केलेले राज्य आपत्ती प्रतिसाद निधीचे सुधारीत निकष व सुधारीत दर स्वीकृत करुन ते राज्यामध्ये दि. ०१ नोव्हेंबर २०२२ पासून लागू करण्याचा निर्णय मा. मंत्रिमंडळाच्या दि.२६ फेब्रुवारी, २०२२ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आला आहे. त्या अनुषंगाने याबाबत सविस्तर आदेश निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

केंद्र शासनाने नैसर्गिक आपत्तीमध्ये होणा-या जीवित व वित्तहानीसाठी संदर्भाधीन दि.१० ऑक्टोबर, २०२२ च्या पत्रान्वये सन २०२२-२३ ते २०२५-२६ या कालावधीकरिता निश्चित केलेले राज्य आपत्ती प्रतिसाद निधींचे निकष व दर राज्य शासनाने स्वीकृत केले असून, त्याची अंमलबजावणी दि.१ नोव्हेंबर, २०२२ पासून लागू करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. नैसर्गिक आपत्तीअंतर्गत आपद्ग्रस्त बाधित व्यक्तींना मदत देण्यासाठी केंद्र शासनाच्या सुधारित निकषानुसार द्यावयाच्या मदतीबाबतचे "परिशिष्ट" या शासन निर्णयासोबत जोडले आहे. सदर परिशिष्टातील तसेच या शासन निर्णयातील नियम व अटींच्या अधीन राहून आपद्ग्रस्तांना प्रचलित कार्यपध्दतीप्रमाणे मदत अनुज्ञेय राहील व त्यानुसार आपदग्रस्त व्यक्तींना मदत देण्याबाबत संबंधित क्षेत्रिय यंत्रणांनी तातडीने कार्यवाही करावी. तसेच केंद्र शासनाने नैसर्गिक आपत्तीच्या मदतीच्या निकषामध्ये अथवा प्रमाणामध्ये बदल केल्यास सदर बदल आहे त्या सुधारित स्वरुपात राज्यामध्ये त्या त्या दिनांकापासून लागू राहतील.

३. केंद्र शासनाच्या सुधारित केलेल्या अटी व शर्तीनुसार बाधित आपद्ग्रस्तांना प्रचलित पध्दतीनुसार विहित वेळेत मदत मंजूर करण्यात यावी. या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टामध्ये दर्शविण्यात आलेल्या **बाबींव्यतिरिक्त** अन्य कोणत्याही बाबींवर "विशेष मदत" देण्याबाबत अत्यंत निकडीच्या प्रकरणात आवश्यकता असल्यास **संबंधित प्रशासकीय विभागाने** योग्य त्या समर्थनासह मंत्रिमंडळासमोर प्रस्ताव सादर करण्याची बाब दि.३० जानेवारी, २०१४ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणे यापुढेही लागू राहील.

४. केंद्र शासनाच्या विहित सूचनांनुसार आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ च्या कलम २० अन्वये स्थापन करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीच्या (राज्य कार्यकारी समिती State Executive Committee) च्या मान्यतेची आवश्यकता आहे अशी प्रकरणे, मा मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील

राज्य कार्यकारी समितीसमोर सादर करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागांची राहील. याबाबतचे समन्वय वित्तीय सल्लागार, मदत व पुनर्वसन यांचेमार्फत करण्यात यावे.

५. केंद्र शासनाच्या विहित सूचनांनुसार केंद्रीय पथकाने पाहणी करण्याबाबतचा प्रस्ताव तसेच सर्वेक्षणाअंती मदतीबाबतचे योग्य ते प्रस्ताव संबंधित प्रशासकीय विभागाने महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन) यांचेमार्फत केंद्रीय पथक / राष्ट्रीय आपत्ती निवारण निधी (NDRF) यांच्याकडे सादर करावेत.

६. राज्य शासनाने वेळोवेळी नैसर्गिक आपत्तीमध्ये नुकसानीकरिता मदत देण्याची प्रक्रिया व जबाबदारी निश्चित केली असून, तसेच मदतीबाबत पंचनामे कशाप्रकारे करावेत याबाबत वेळोवेळी आदेश निर्गमित केले आहेत. त्यानुसार, केंद्र शासनाने विहित केलेल्या अटी व शर्तीनुसार केंद्र शासनाच्या मदतीच्या प्रमाणात आपद्ग्रस्तांना तात्काळ मदत देण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची असेल. त्यासाठी विहित निकषानुसार निधीचे वितरण राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून मदत व पुनर्वसन विभागामार्फत केले जाईल. **विविध मदतीपेक्षा अधिकची मदत देणे आवश्यक असल्याचे विभागाचे मत असल्यास, त्या संबंधित प्रशासकीय विभागाने योग्य त्या समर्थनासह आवश्यकता असल्यास महसूल व वन विभागाच्या मदत व पुनर्वसन उपविभागाचे अभिप्राय घेऊन त्याबाबतचा प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करावा.** राज्यातील प्रशासकीय विभागांनी नैसर्गिक आपत्ती निवारणासंदर्भात केलेल्या कार्यवाहीचा तपशील महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन) यांना तातडीने कळविण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागांची राहील.

७. वरीलप्रमाणे विहित नैसर्गिक आपत्तीमुळे झालेल्या नुकसानीसाठी "२२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य" या मुख्य लेखाशिर्षाखालील तरतुदीमधून मदत अनुज्ञेय असेल.

८. सदर आदेश सर्व संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी त्यांच्या पर्यवेक्षणाखालील सर्व संबंधित क्षेत्रिय यंत्रणांच्या निदर्शनास आणावेत. सदर आदेशाचे संबंधीत मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी तसेच सर्व क्षेत्रिय यंत्रणांनी काटेकोरपणे पालन करावे.

९. सदर आदेश, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४०६/२०२२/व्यय-०९, दि.२१.१२.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२७१६०७४१४०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2023.03.27 16:13:25 +05'30'

**( संजय औ. धारुरकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
२. सर्व विभागीय आयुक्त
३. आयुक्त कृषि, कृषि संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

४. आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. आयुक्त, मत्स्य व्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. सर्व जिल्हाधिकारी
७. सर्व आयुक्त महानगरपालिका
८. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा
१०. संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
११. संचालक माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१२. अधिदान व लेखाधिकारी, बृहन्मुंबई
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१४. महसूल व वन विभागातील सर्व कार्यासने,
१५. उपसचिव/ सहसचिव (आव्यप्र-१/आव्यप्र-२/म-७/म-११/ब- १/पीएसी/पीएसी-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. वित्त विभाग (व्यय-३/ व्यय-९, अर्थसंकल्प- ३/ अर्थसंकल्प- ६). मंत्रालय, मुंबई
१७. कार्यासन (निवडनस्ती).

**प्रत माहितीसाठी अग्रेषित-,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानभवन,मुंबई
४. विधानमंडळाचे सर्व सन्माननीय सदस्य,
५. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र मुंबई/नागपूर (प्रत्येकी ३ प्रती)
६. महालेखापाल - १/२ (लेखापरिक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर (प्रत्येकी ३ प्रती)
७. प्रधान सचिव (मदत पुनर्वसन) यांचे स्वीय सहाय्यक
८. संचालक, आपती व्यवस्थापन यांचे स्वीय सहाय्यक.

## शासन निर्णय क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.३४९/म-३, दि. २७ मार्च, २०२३ सोबतचे

## परिशिष्ट

### Revised List of Items and Norms of Assistance From State Disaster Response Fund (SDRF) and National Disaster Response Fund (NDRF)

### राज्य आपत्ती प्रतिसाद निधी (SDRF) व राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद (NDRF) मधून सुधारित बाबी व निकषानुसार देण्यात येणारे अर्थसहाय्य

| No | ITEM | NORMS OF ASSISTANCE |
|---|---|---|
| **1** | **Gratuitous Relief** | |
| | a) Ex-Gratia payment to families of deceased persons | Rs.4.00 lakh per deceased person, including those involved in relief operation or associated in preparedness activities, subject to certification regarding cause of death from appropriate authority. |
| | (अ) आपद्ग्रस्त मृत व्यक्तीच्या कुटुंबियांना देय आर्थिक सहाय्य | योग्य त्या प्राधिकाऱ्याने मृत्यूचे कारण प्रमाणित करण्याच्या अधीन राहून मृत व्यक्तीच्या वारसांना रु.४.०० लाख इतकी मदत अनुज्ञेय राहील, आपत्तीमध्ये मदत कार्यात तसेच पूर्वतयारीमध्ये सहभागी व्यक्तीनादेखील सदर मदत अनुज्ञेय राहील. |
| | b) Ex-Gratia payment for loss of a limb or eye (s). | Rs 74,000 -/per person, when the disability is between 40 %and 60%<br>Rs.2.50 lakh per person, when the disability is more than 60%.<br>Subject to certification by a doctor from a hospital or dispensary of Government, regarding the extent and cause of disability. |
| | (ब) अवयव अथवा डोळे निकामी झाल्यास देय आर्थिक सहाय्य | • ४०% ते ६०% अपंगत्व आल्यास रु ७४,०००/-<br>• ६०% हून अधिक अपंगत्व आल्यास रु.२.५० लाख इतकी मदत<br>याबाबत अपंगत्वाचे प्रमाण व त्याच्या कारणाबाबत शासकीय दवाखाना / इस्पितळातील वैद्यकीय अधिकाऱ्याने प्रमाणित करणे आवश्यक राहील |
| | c) Grievous injury requiring hospitalization | Rs.16,000 -/per person requiring hospitalization for more than a week.<br>Rs.5,400 -/per person requiring hospitalization for less than a week.<br>Note: Injured person getting treatment under the “Ayushman Bharat” Yojna, will not be eligible for relief under this item. |
| | क) जखमी व्यक्ती इस्पितळात दाखल झाला असल्यास | • एक आठवड्यापेक्षा अधिक कालावधीकरिता इस्पितळात दाखल झाल्यास रु.१६०००/-<br>• एक पेक्षा कमी कालावधीकरिता दाखल झाला असल्यास रु. ५४००/- |

| | | |
|---|---|---|
| | | टीप- आयुष्यमान भारत योजनेखालील उपचार घेणारी व्यक्ती मदतीसाठी पात्र राहणार नाही. |
| | d) Clothing and utensils/ house-hold goods for families, whose houses have been washed away/ fully damaged/ severely inundated for more than two days due to a natural calamity. | Rs.2,500 -/per family, for the loss of clothing.<br>Rs.2,500 -/per family, for loss of utensils/ household goods |
| | (ङ) नैसर्गिक आपत्तीमध्ये दोन दिवसापेक्षा अधिक कालावधीकरिता क्षेत्र पाण्यात बुडाले असल्यास घरे पूर्णतः वाहून गेली असल्यास / पूर्णतः क्षतीग्रस्त झाली असल्यास कपडे/ भांडी / घरगुती वस्तुंकरिता अर्थसहाय्य | • प्रतिकुंटुब रु.२५००/- झालेल्या नुकसानीकरिता<br>• प्रतिकुटुंब रु.२५००/- घरगुती भांडी/ वस्तु नुकसानीकरिता |
| | e) Gratuitous relief for families whose livelihood is seriously affected. | Gratuitous Relief (GR) for families, whose livelihood is seriously affected will be provided to two adults members of the affected family as per actual rate of MNREGA per day or average rate of all States/UTs per day, whichever is lower. For this purpose, notification issued by Ministry of Rural Development from time to time, is to be referred for calculating average rate. The relief amount should be disbursed through DBT/cash (In case of exigency of the situation only) or the State Government may provide this relief in kind.<br>State Govt. will certify that identified beneficiaries are not housed in relief camps, during the period GR is provided. Further, the State Government will provide the basis and process for arriving at such beneficiaries, district-wise.<br>Period for providing gratuitous relief will be as per the assessment of the State Executive Committee (SEC) and the Central Team (in case of NDRF). The default period of assistance will be upto 30 days, which may be extended upto 60 days in the first instance, if required, and subsequently upto 90 days in case of drought/ pest attack. Depending on the ground situation, the SEC can extend the time period beyond the prescribed limit. Provided that expenditure on this account, in no case, should exceed 25% of SDRF allocation under this window (Response & Relief) for the year.<br>Further, to ensure transparency, the list of persons to whom Gratuitous Relief is provided, should be uploaded on the website of the State Government. The State Government shall notify the basis and proof for the identification of beneficiaries in a transparent manner. |

| | | |
|---|---|---|
| | (इ) नैसर्गिक आपत्तीमध्ये गंभीरपणे प्रभावित झालेल्या कुटुंबियांना दैनंदिन मदत | ज्या कुटुंबांच्या उपजीविकेवर गंभीर परिणाम झाला आहे, अशा कुटुंबांसाठी दैनंदिन मदत प्रभावित कुटुंबातील दोन प्रौढ सदस्यांना दररोज मनरेगाच्या वास्तविक दरानुसार किंवा सर्व राज्याच्या /केंद्रशासित प्रदेशाच्या सरासरी दरानुसार, यापैकी जे कमी असेल ते दिले जाईल. या उद्देशासाठी, ग्रामीण विकास मंत्रालयाने वेळोवेळी जारी केलेली अधिसूचना, सरासरी दर मोजण्यासाठी संदर्भित केली जाते. मदतीची रक्कम डीबीटी/रोखद्वारे (केवळ तातडीच्या परिस्थितीत) वितरित केली जावी किंवा राज्य सरकार ही मदत वस्तु स्वरुपात देऊ शकेल.<br>राज्य शासनाने ज्या आपद्ग्रस्तास मदत करावयाची आहे, त्याने मदत छावणीमध्ये/आश्रय घेतला नसल्याचे प्रमाणित करावे. त्याचप्रमाणे राज्य शासनाने आपद्ग्रस्तांना कोणत्या पद्धतीने व कशा प्रकारे मदत देण्यात येईल याबाबतची जिल्हानिहाय कार्यनिती करावी.<br>सानुग्रह अनुदान देण्याचा कालावधी राज्य कार्यकारी समिती आणि (राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधी प्रकरणी) केंद्रीय पथक यांनी मूल्यांकित केल्यानुसार निर्धारित करेल. तथापि, सदर कालावधीतील सहाय्य हे (by default) ३० दिवसांचा असेल. तद्नंतर आवश्यकतेनुसार सदर कालावधी प्रथमतः ६० दिवसांपर्यंत वाढविता येईल आणि त्यानंतर दुष्काळ, टोळधाड या कारणास्तव आवश्यकतेनुसार ९० दिवसांपर्यंत सदर कालावधी वाढविता येईल. प्रत्यक्ष आपतीची परिस्थिती विचारात घेऊन, राज्य कार्यकारी समितीस सदर कालावधीमध्ये वाढ करता येईल तथापि या बाबीसाठी होणारा खर्च राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या वार्षिक तरतुदीच्या २५ टक्केहून अधिक असता कामा नये.<br>याशिवाय, पारदर्शकता सुनिश्चित करण्यासाठी ज्या व्यक्तींना नि:शुल्क मदत दिली जाते त्यांची यादी राज्य सरकारच्या वेबसाइटवर अपलोड करावी. राज्य सरकार लाभार्थी |

| | | |
|---|---|---|
| | | ओळखण्यासाठी आधार आणि पुरावा पारदर्शक पद्धतीने सूचित करेल. |
| **2** | **Search & Rescue Operations शोध व बचाव मोहीम** | |
| | (a) Cost of search and rescue measures/ evacuation of people affected/ likely to be affected. | As per the actual cost incurred, assessed by SEC and recommended by the Central Team (in case of NDRF).<br>By the time the Central Team visits the affected area, these activities may be already over. Therefore, the SEC and the Central Team can recommend actual/ near-actual costs. |
| | (अ) शोध व बचाव उपाययोजना / बाधित व्यक्ती/बाधित होणा-या व्यक्तींना सुरक्षितस्थळी हलविण्यासाठीचा खर्च | राज्य कार्यकारी समितीने मूल्यांकित केलेले व (राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधीबाबतीत) केंद्रीय पथकाने शिफारस केलेला प्रत्यक्ष खर्च.<br>केंद्रीय पथकाने आपद्ग्रस्त क्षेत्रास भेट देण्यापूर्वी वरील कार्यवाही पूर्ण झालेली असेल, त्यावेळी राज्य स्तरीय समिती आणि केंद्रीय पथक प्रत्यक्ष झालेला खर्च अथवा जवळपास येणारा खर्च याबाबत शिफारस करेल. |
| | (b) Hiring of boats for carrying immediate relief and saving lives. | As per actual cost incurred, assessed by SEC and recommended by the Central Team (in case of NDRF)<br>The quantum of assistance will be limited to the actual expenditure incurred on hiring boats and essential equipment required for rescuing stranded people and thereby saving human lives during a notified natural calamity. |
| | ब) प्राण वाचविण्याकरिता तातडीचे मदत कार्य करण्याकरिता बोटी भाड्याने घेतल्या असल्यास | राज्य कार्यकारी समितीने मूल्यांकित केलेले व (राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधीबाबतीत) केंद्रीय पथकाने शिफारस केलेला प्रत्यक्ष खर्च विहित नैसर्गिक आपत्तीमध्ये प्राण वाचविण्याकरिता तसेच आपत्तीमध्ये अडकलेल्या व्यक्तींची सुटका करण्याकरिता बोटी भाड्याने घेणे आणि आवश्यक साधनांचा वापर करण्याकरिता येणारा प्रत्यक्ष खर्च अनुज्ञेय असेल. |
| **3** | **Relief Measures मदत कार्य** | |
| | a) Provision for temporary accommodation, food, clothing, medical care Gen-set etc. for people affected/ evacuated and sheltered in relief camps. | As per actual cost incurred, and assessed by SEC and recommended by the Central Team (in case of NDRF), for a period upto 30 days. The SEC would need to specify the number of camps, their duration and the number of persons in camps. In case of continuation of a calamity like drought, or widespread devastation caused by earthquake or flood etc., this period may be extended to 60 days. Depending on the ground situation, the SEC can extend the time period |

| | | |
|---|---|---|
| | | beyond the prescribed limit. Provided that expenditure on this account, in no case, should exceed 25% of SDRF allocation under this window (Response & Relief) for the year.<br>Medical care to be provided from National Health Mission (NHM). |
| | (अ) आपत्तीमध्ये मदत छावणीमध्ये आश्रय घेतलेल्या व्यक्तीकरिता तात्पुरती राहण्याची व्यवस्था, अन्नधान्य, कपडे, औषधोपचार इत्यादीकरिता | राज्य कार्यकारी समितीने आवश्यकतेनुसार निश्चित केल्याप्रमाणे आणि केंद्रीय पथकाने शिफारस केल्यानुसार (राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधीमधून मदत अनुज्ञेय असल्यास ३० दिवसांच्या कालावधीकरिता अर्थसहाय्य अनुज्ञेय असेल. राज्य कार्यकारी समितीने मदत छावण्यांची संख्या, कालावधी तसेच छावण्यांतील बाधितांची संख्या, या माहितीच्या आधारे कालावधी व छावण्यांची संख्या निश्चित करेल भूकंप, पूर, दुष्काळ इ. तीव्र स्वरुपाच्या नैसर्गिक आपत्तीमध्ये सदर कालावधी ६० दिवसांकरिता वाढविता येईल व तीव्र दुष्काळी परिस्थितीमध्ये तो ९० दिवसांकरिता वाढविता येईल. प्रत्यक्ष आपत्तीची परिस्थिती विचारात घेऊन, राज्य कार्यकारी समितीस सदर कालावधीमध्ये वाढ करता येईल तथापि या बाबीसाठी होणारा खर्च राज्य आपसी प्रतिसाद निधीच्या वार्षिक तरतुदीच्या २५ टक्केहून अधिक असता कामा नये.<br>वैद्यकीय मदत राष्ट्रीय आरोग्य मिशन (NHM) मधून देण्यात यावी. |
| | (b) Air dropping of essential supplies and rescue by Air Force. | As per actual cost incurred, assessed by SEC and recommended by the Central Team (in case of NDRF).<br>The quantum of assistance will be limited to actual amount raised in the bills by the Ministry of Defense for airdropping of essential supplies and rescue operations only. |
| | ब) हवाई मार्गे आवश्यक वस्तुंचा पुरवठा करणे आणि हवाई दलाकडून बचाव करणे | राज्य कार्यकारी समितीने आणि केंद्रीय पथकाच्या शिफारशीनुसार (राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधीच्या बाबतीत) आवश्यकतेनुसार प्रत्यक्ष खर्चाच्या आधारे मूल्यांकन करेल.<br>केंद्रीय संरक्षण मंत्रालयामार्फत सादर केलेल्या प्रत्यक्ष खर्चाच्या देयकाच्या मर्यादेत राहील तसेच हवाई मार्गाने आवश्यक वस्तुंचा पुरवठा करणे व बचाव कार्य करणे या प्रयोजनाकरिताच सदर मदत अनुज्ञेय राहील. |

| | | |
|---|---|---|
| | c) Provision of emergency supply of drinking water in rural areas and urban areas. | As per actual cost, based on the assessment of need by SEC and recommended by the Central Team (in case of NDRF), up to 30 days, which may be extended upto 90 days in case of drought. Depending on the ground situation, the SEC can extend the time period beyond the prescribed limit. Provided that expenditure on this account, in no case, should exceed 25% of SDRF allocation under this window (Response & Relief) for the year. |
| | क) ग्रामीण व नागरी भागाकरिता पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक पुरवठा. | राज्य कार्यकारी समितीने आणि केंद्रीय पथकाच्या शिफारशीनुसार (राष्ट्रीय आपती प्रतिसाद निधीच्या बाबतीत) आवश्यकतेनुसार प्रत्यक्ष खर्चाच्या आधारे मूल्यांकन करेल. हा कालावधी ३० दिवसांसाठी असेल व दुष्काळजन्य परिस्थितीत सदर मुदत ९० दिवसांपर्यंत वाढविता येईल. प्रत्यक्ष आपत्तीची परिस्थिती विचारात घेऊन, राज्य कार्यकारी समितीस सदर कालावधीमध्ये वाढ करता येईल. तथापि या बाबीसाठी होणारा खर्च राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या वार्षिक तरतुदीच्या २५ टक्केहून अधिक असता कामा नये. |
| **4** | **Clearance Of Affected Areas क्षतीग्रस्त बाधित क्षेत्र पूर्ववत करणे** | |
| | a) Clearance of debris in public areas. | As per actual cost, for a period upto 30 days from the date of start of the work based on assessment of need by SEC for the assistance to be provided under SDRF and as per assessment of the Central team for assistance to be provided under NDRF. |
| | (अ) सार्वजनिक क्षेत्रातील जमा झालेला कचरा व ढिगारे उचलणे. | राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून रक्कम उपलब्ध करुन द्यावयाची झाल्यास राज्य कार्यकारी समितीकडून आवश्यकतेप्रमाणे मूल्यांकनानुसार काम सुरु झाल्याच्या दिवसापासून कामावर ३० दिवसांच्या आंत झालेला प्रत्यक्ष खर्च, राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधीमधून रक्कम देय असल्यास केंद्रीय पथकाच्या मूल्यांकनाप्रमाणे मदत उपलब्ध करुन देण्यात यावी. |
| | b) Draining off flood water in affected areas. | As per actual cost within 30 days from the date of start of the work based on assessment of need by SEC for the assistance to be provided under SDRF and as per assessment of the Central team (in case of NDRF) |
| | ब) पूरग्रस्त बाधित क्षेत्रातून पाण्याचा निचरा करण्याबाबत | राज्य कार्यकारी समितीने मूल्यांकित केल्यानुसार, काम सुरु झाल्याच्या दिवसापासून ३० दिवसांच्या आंत कामावर झालेला प्रत्यक्ष खर्च राज्य |

| | | |
|---|---|---|
| | | आपत्ती प्रतिसाद निधीमधून आणि केंद्रीय पथकाने मूल्यांकित केल्यानुसार (राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधीप्रकरणी मदत उपलब्ध करुन देता येईल. |
| | c) Disposal of dead bodies/ Carcasses | As per actual cost, based on assessment of need by SEC and recommendation of the Central team (in case of NDRF) |
| | क) मृत देहांची विल्हेवाट लावणे | राज्य कार्यकारी समितीने आणि केंद्रीय पथकाच्या शिफारशीनुसार (राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधीच्या बाबतीत) आवश्यकतेनुसार प्रत्यक्ष खर्चाच्या आधारे मूल्यांकन करेल. |
| **5** | **Agriculture कृषी विषयक** | |
| **(i)** | Assistance to Small and Marginal farmers having landholding up to 2 ha.<br>**२ हेक्टर मर्यादेपर्यंत जमीन धारण करणाऱ्या शेतकऱ्यांना मदत** | |
| (A) | Assistance for land and other loss **शेतजमिन व इतर नुकसानीसाठी अर्थसहाय्य** | |
| | a) De-silting of agricultural land (where thickness of sand/ silt deposit is more than 3", to be certified by competent authority of the State Government) | Rs 18,000/- per hectare for each item.<br>Above is subject to a minimum assistance of not less than Rs 2,200/- per farmer.<br>(Subject to the condition that no other assistance/ subsidy has been availed of by/ is eligible to the beneficiary under any other Government Scheme) |
| | b) Removal of debris on agriculture land in hilly areas. | |
| | c) Desilting / Restoration /Repair of fish farms. | |
| | अ) शेत जमिनीवरील गाळ (वाळूचा / गाळांचा /मातीचा थर ३ इंचापेक्षा अधिक जमा झाल्याचे, राज्य शासनाच्या प्राधिकृत अधिकाऱ्याने प्रमाणित करणे आवश्यक) | प्रत्येक बाबीकरिता रु.१८०००/- प्रतिहेक्टर<br>प्रति शेतकरी कमीत कमी अनुज्ञेय मदत रु.२२००/- पेक्षा कमी नसावी. (मात्र लाभार्थ्याने अन्य कोणत्याही शासकीय योजनेखाली मदत अथवा अर्थसहाय्य / अनुदान घेतलेले नसावे.) |
| | ब) डोंगराळ शेत जमिनीवरील मातीचा ढिगारा (मलबा) काढणे. | |
| | क) मत्स्यशेती दुरुस्ती करणे/ मातीचा थर काढणे / पूर्ववत करणे | |
| | (d) Loss of substantial portion of land caused by landslide, avalanche, change of course of rivers. | Rs.47,000/- per hectare to only those small and marginal farmers whose ownership of the land is legitimate as per the revenue records. Above is subject to a minimum assistance of not less than Rs.5,000/- per farmer. |
| | ड) दरड कोसळणे, जमीन खरडणे, खचणे व नदी पात्र/प्रवाह बदलल्यामुळे शेत जमिन वाहून जाणे | महसूल अभिलेखानुसार शेत जमिनीचे मालक असलेल्या फक्त अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांना रु.४७,०००/- प्रति हेक्टर या दराने मदत अनुज्ञेय राहील.<br>कमीत कमी अनुज्ञेय मदत रु.५,०००/- पेक्षा कमी नसावी. |

| | | |
|---|---|---|
| **B.** | **Input subsidy (where crop loss is 33% and above) निविष्ठास्वरुपात मदत (३३% व त्यापेक्षा अधिक झालेल्या शेतीपिकांच्या नुकसानीसाठी)** | |
| | a) For agriculture crops, horticulture crops and annual plantation crops. | Rs.8,500/- per ha. in rain fed areas.<br>Above is subject to a minimum assistance of not less than Rs.1,000/- per farmer and restricted to sown areas.<br>Rs.17,000/- per ha. in assured irrigated areas.<br>Above is subject to a minimum assistance of not less than Rs.2,000/- per farmer and restricted to sown areas. |
| | (अ) शेती पिके, फळ पिके आणि वार्षिक लागवडीची पिके | कोरडवाहू क्षेत्रासाठी रु.८,५००/- प्रति हेक्टर आणि पेरणी केलेल्या क्षेत्राच्या मर्यादेत.<br>कमीत कमी अनुज्ञेय मदत रु.१,०००/- पेक्षा कमी नसावी आणि पेरणी केलेल्या क्षेत्राच्या मर्यादेत अनुज्ञेय राहील.<br>आश्वासित जलसिंचन योजनेखालील क्षेत्राकरिता रु.१७,०००/- प्रतिहेक्टर<br>कमीत कमी अनुज्ञेय मदत रु.२,०००/- पेक्षा कमी नसावी आणि पेरणी केलेल्या क्षेत्राच्या मर्यादेत अनुज्ञेय राहील. |
| | (b) Perennial crops/ Agro Forestry (Plantation in own farmland) | Rs.22,500/- ha. for all types of perennial crops/ Agro forestry (Plantation in own farmland), subject to a minimum assistance of not less than Rs.2,500/- per farmer and restricted to sown areas. |
| | (ब) बहुवार्षिक पीके | बहुवार्षिक पिकांकरिता प्रतिहेक्टरी रु.२२,५००/ सदर मदत पेरणी केलेल्या क्षेत्राकरिताच अनुज्ञेय असून कमीत कमी अनुज्ञेय मदत रु.२,५००/- पेक्षा कमी नसावी. |
| | c) Sericulture | Rs.6,000 -/Per ha. for Eri, Mulberry, Tussar.<br>Rs.7,500 -/per ha. for Muga.<br>Above is subject to a minimum assistance of not less than Rs1,000/- per farmer and restricted to sown areas. |
| | (क) रेशीम उत्पादन | एरी, मलबेरी, टसर रेशमासाठी रु.६,०००/ प्रतिहेक्टर<br>मुगा रेशमासाठी रु.७,५००/- प्रति हेक्टर<br>कमीत कमी अनुज्ञेय मदत रु.१,०००/- पेक्षा कमी नसावी आणि पेरणी केलेल्या क्षेत्राच्या मर्यादेत अनुज्ञेय राहील. |
| (ii) | Input subsidy to farmers having more than 2 Ha. of land holding | • Rs.8,500/- per hectare in rain fed areas and restricted to sown areas.<br>• Rs.17, 000/- per hectare for areas under assured irrigation and restricted to sown areas. |

| | | |
|---|---|---|
| | | • Rs.22,500/- per hectare for all types of perennial crops/ trees including agro forestry (Plantation in own farmland) and restricted to sown areas.<br>Assistance may be provided where crop loss is 33% and above, subject to a ceiling of 2 ha. per farmer. |
| (iii) | २ हेक्टर क्षेत्रापेक्षा जास्त भूधारण करणा-या शेतकऱ्यांना निविष्ठा अनुदान | • कोरडवाहू क्षेत्रासाठी रु.८,५००/- प्रतिहेक्टर आणि पेरणी क्षेत्राच्या मर्यादेत,<br>• आश्वासित जलसिंचन योजनेखालील क्षेत्राकरिता रु.१७,०००/- प्रतिहेक्टर आणि पेरणी क्षेत्राच्या मर्यादेत.<br>• सर्व प्रकारच्या बहुवार्षिक पिकांकरिता रु.२२,५००/- प्रति हेक्टर आणि पेरणी क्षेत्राच्या मर्यादेत.<br>३३% अथवा त्यापेक्षा अधिक शेती पिकांचे नुकसान झाल्यास व २ हेक्टरच्या मर्यादेपर्यंत मदत अनुज्ञेय असेल. |
| **6** | **Animal Husbandry: Assistance To Small And Marginal Farmers And Landless Livestock Owners.** | |
| | **पशुसंवर्धनाच्या नुकसानीकरिता अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांना आणि भूमिहिन पशुधन मालकांना सहाय्य** | |
| | Assistance for the loss of milch animals, draught animals or animals used for haulage. | Milch Animals<br>Rs.37,500/- Buffalo/cow/camel/yak/ Mithun etc.<br>Rs.4,000/- Sheep/ Goat/ Pig<br>Draught animals-<br>Rs.32,000/- Camel/ horse/ bullock etc.<br>Rs.20,000/- Calf/Donkey/ Pony/ Mule/ Heifers<br>The assistance may be restricted for the actual loss of economically productive animals due to notified natural calamity and will be subject to a ceiling of 3 large milch animals and /or 30 small milch animals or 3 large draught animals and/or 6 small draught animals per household irrespective of whether a household has lost a larger number of animals.<br>(Claim for loss of animals will be considered only if number and type of animals owned by Small and Marginal Farmers/Landless Livestock Owners are registered with local/designated authorities.)<br>**Poultry:-**<br>Poultry @ 100/- per bird subject to a ceiling of an assistance of Rs 10,000/- per beneficiary household. The death of the poultry birds should be on account of a natural calamity.<br>**Note:** Relief under these norms is not eligible if the assistance is available from any other |

| | | |
|---|---|---|
| | | Government Scheme, e.g. loss of birds due to Avian Influenza or any other diseases for which the Department of Animal Husbandry has a separate scheme for compensating the poultry owners. |
| | (ii) दुधाळ जनावरे ओढकाम करणारी जनावरे किंवा माल वाहतुकीसाठी वापरण्यात येणारी जनावरे दगावल्यास दिली जाणारी मदत | • दुधाळ जनावरे :<br>रू.३७५००/-म्हैस / गाय/उंट/याक/ मिथुन इत्यादी<br>रु.४०००/- मेंढी / बकरी / डुक्कर<br>• ओढकाम करणारी जनावरे -<br>रु.३२,०००/- उंट / घोडा/ बैल इत्यादी<br>रू.२०,०००/- वासरू / गाढव / शिंगरू / खेचर जरी एखाद्या घरातील जनावरे मोठ्या संख्येने मृत झाली असतील तरी आर्थिकदृष्ट्या मदत ही फक्त उत्पादनक्षम जनावरांपुरती मर्यादीत ठेवावी. ३ मोठे दुधाळ जनावरे किंवा ३० छोटी दुधाळ जनावरे किंवा ३ ओढकाम करणारी मोठी जनावरे किंवा ६ ओढकाम करणारी लहान जनावरे प्रतिकुटुंब या मर्यादेत मदत अनुज्ञेय असावी.<br>(जनावरांचा प्रकार व संख्या राज्य शासनाच्या स्थानिक/प्राधिकृत अधिका-याकडे नोंदविली असल्यासच जनावरे दगावल्याबाबतचा दावा मान्य केला जाईल.)<br>**कुक्कुटपालन :-** मदत रू.१००/- प्रती कोंबडी, रू.१०,०००/- प्रती कुटुंब मर्यादेत. कोंबड्यांचा मृत्यु हा नैसर्गिक आपत्तीमुळे झालेला असणे आवश्यक.<br>**टीप :-** अन्य कोणत्याही शासकीय योजनेखाली मदत उपलब्ध करण्यात आली असेल तर या योजनेअंतर्गत मदत अनुज्ञेय असणार नाही. उदा. पक्षांमधील हिवताप किंवा तत्सम रोग यासाठी पशुसंवर्धन विभागाच्या स्वतंत्र योजनेखाली कुक्कुटपालन मालकांना मदत देण्यात येते. |
| | Provision of fodder/feed concentrate including water supply and medicines in cattle camps.<br>Explanation: It will also include existing Gaushalas, if authorized by the State Government Notification or Government Order, to act as a cattle camp subject to the following conditions:<br>During the period of calamity, District Administration will assess the requirement of cattle shelter and number of gaushala required to be notified as | Large animals- Rs.80 -/per day.<br>Small animals- Rs.45 -/per day.<br>Period for providing relief will be as per the assessment of the SEC and the Central Team (in case of NDRF). The default period for assistance will be for the period of calamity up to 30 days, which may be extended up to 60 days in the instance and in case of severe drought up to 90 days Depending on the ground situation, the SEC can extend the time period beyond the prescribed limit. Provided that expenditure on this account, in no case, should exceed 25% of SDRF |

